**राज्यामध्ये मुलींची वसतिगृहे उघडणे**
**सन २००९-१० करिता खर्चास मंजूरी देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र. अर्थसं२००९/(८०/०९)/मशि-३
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक -०१ फेब्रुवारी, २०१०

पहा : १) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे क्रअर्थसं२००९/(३१५६२/०६/०९)/लेखा२ २९४६/दिनांक १२.०८.२००९ चे पत्र.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज१०.०९/प्रक्र१५१/२००९/अर्थसंकल्प३, दिनांक ३० जून, २००९.

**प्रस्तावना** :- वार्षिक योजना सन २००९-१० मध्ये राज्यामध्ये मुलींची वसतिगृहे उघडणे या योजनांतर्गत योजनेखाली ३१ सहाय्यक अनुदाने या उद्दिष्टासाठी एकूण रु.१८.०० लक्ष नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु.८.३३ लक्ष नियतव्यय लेखानुदानाद्वारे सन २००९-१० या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. उर्वरित रु. ९.६७ लक्ष नियतव्यय जून अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित झाला असून सदर नियतव्ययातून राज्यातील प्रियदर्शनी वसतीगृहांना अनुदान द्यावयाचे असल्यामुळे, सदर रु. ९.६७ लक्ष इतक्या खर्चास मंजूरी देणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- संदर्भ क्रमांक २ मधील वित्त विभागाच्या परीपत्रकाच्या अनुषगाने सन २००९-१० करिता राज्यामध्ये मुलींची वसतीगृहे उघडणे या योजनेसाठी ३१ सहाय्यक अनुदाने या उद्दीष्टांकरिता रु. ९.६७ लक्ष (रुपये नऊ लाख सदुसष्ट हजार फक्त ) इतकी रक्कम खर्च करण्यांस शासनाची मंजूरी देण्यांत येत आहे. सदरचा निधी मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्यांत यावा.

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक डब्ल्यु २ २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०३, शासकीय महाविद्यालये व संस्था १०३(०५)विद्यार्थ्यांची वसतीगृहे, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०५)(०३) तालुक्यामध्ये मुलींची वसतिगृहे उघडणे (२२०२ ३५६६) ३१ सहाय्यक अनुदाने " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व उपरोक्त मंजूर तरतुदीतून भागविण्यांत यावा.

३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वित्त विभाग शासन परिपत्रक संदर्भ क्रमांक २ मधील सूचनांनुसार आवश्यक ते पूरक आदेश निर्गमित करावेत व अहवाल शासनास सादर करावा.

४. हे आदेश वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.८६०/०९/व्यय-५ दि.०७.१२.२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

५. सदरहू आदेश शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यांत आलेला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००२०११७०१३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वा. अ. बोरसे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक, उच्च शिक्षण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीय शिक्षण सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२ मुंबई / नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हयांचे कोषागार अधिकारी.
वित्त विभाग (व्यय ५ / अर्थसंकल्प ३), मंत्रालय मुंबई
कार्यासन साशि १, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (मशि ३)

D/anngito.doc